**महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ नुसार शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्त्याखालील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिका-यांच्या बदल्या तसेच पदोन्नतीने देण्यात येणा-या पदस्थापनेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- ईएसटी ३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -३२.
दिनांक : १७ मार्च, २०१७.

वाचा :- महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(१)(२)(३) यानुसार नियतकालिक बदल्या व कलम ४(४) व ४(५) नुसार प्रशासकीय कारणास्तव व विनंतीनुसार मध्यावधी बदल्या करण्यात येतात. शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील गट-अ प्रशासन शाखेमधील शिक्षण संचालक, शिक्षण सहसंचालक, शिक्षण उपसंचालक, प्रशासन अधिकारी व शिक्षणाधिकारी तसेच गट-ब प्रशासन शाखेमधील उपशिक्षणाधिकारी, अधिक्षक (म.शि.से.), अधिक्षक (सा.रा.से.), विधि अधिकारी त्याचप्रमाणे गट-अ शिक्षण सक्षमीकरण शाखेमधील प्राचार्य व वरिष्ठ अधिव्याख्याता आणि गट-ब मधील अधिव्याख्याता या संवर्गात कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांची बदली व पदोन्नतीबाबतचे आदेश शासनस्तरावरून सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येतात. आयुक्त शिक्षण कार्यालयाकडून कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यानंतरदेखिल काही अधिकारी मुख्य कार्यकारी अधिकारी / संबंधित आस्थापना अधिकारी हे कार्यमुक्त केले नसल्याचे कारण दाखवून कार्यमुक्त होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तसेच पदोन्नतीचे आदेश निर्गमित झाल्यानंतर पदोन्नतीचे ठिकाण गैरसोयीची असल्याकारणाने, पदोन्नतीचे आदेश प्राप्त झाले नाहीत असे सांगून काही कर्मचारी/अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होत नाहीत व नंतर एक/दोन वर्षानंतर पदोन्नतीने दिलेली पदस्थापना बदलून पदोन्नती देण्याची मागणी करतात.

सक्षम प्राधिका-यांची मान्यता घेऊन निर्गमित होणा-या बदल्यांचे आदेश व पदोन्नतीचे आदेश याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यासाठी सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींस अनुसरुन निर्गमित केलेल्या बदली आदेशाची व पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेच्या आदेशाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यासाठी खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

१) शालेय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र शिक्षण सेवा व सामान्य राज्य सेवेमधील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रशासकीय विभाग म्हणून शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून आदेश निर्गमित करण्यात येतात.

२) सदर आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कार्यमुक्त करण्याबाबतचे अधिकार राज्यस्तरीय प्रमुख म्हणून आयुक्त शिक्षण यांना प्रदान करण्यात येत आहेत. त्यामुळे आयुक्त शिक्षण कार्यालयाकडून गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांचे कार्यमुक्तीचे आदेश तात्काळ निर्गमित करण्यात येतील.

३) सदर कार्यमुक्तीचे आदेश आयुक्त शिक्षण कार्यालयाकडून निर्गमित झाल्यानंतर संबंधित अधिनस्त कार्यालयाकडून परत कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता राहणार नाही.

४) आयुक्त शिक्षण कार्यालयाकडून कार्यमुक्तीचे आदेश निर्गमित झाल्यानंतर तातडीने कार्यमुक्त होऊन बदली आदेशात नमूद केलेल्या ठिकाणी तातडीने रुजू होणे संबंधित अधिकाऱ्यांना बंधनकारक राहील.

५) अपरिहार्य कारणास्तव एखाद्या अधिकाऱ्यास कार्यमुक्त करणे शक्य नसेल. (उदा.सदर अधिकारी कार्यमुक्त केल्यास शाळेतील अथवा अकरावी ऑनलाईन प्रवेश होण्यावर मुलांचे प्रवेश थांबतील किंवा दहावी अथवा बारावी परीक्षेचा निकाल घोषित करण्यावर परिणाम होणार असेल तर अशा अपवादात्मक बाबतीत) ठोस समर्थनासह प्रस्ताव आयुक्त शिक्षण कार्यालयामार्फत बदलीचे आदेश निर्गमित झाल्यापासून १५ दिवसांच्या आत शासनाकडे पाठविण्यात यावे. सदर प्रस्तावांवर शासनाकडून गुणवत्तेनुसार निर्णय घेण्यात येईल व सदर निर्णय बंधनकारक राहील.

६) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ नुसार पदग्रहण अवधी अनुज्ञेय आहे. सदर नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या कालावधीमध्ये अधिकाऱ्यांना त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होणे बंधनकारक राहील. मात्र सदर कालावधीमध्ये रुजू न होणाऱ्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत ते बदलीच्या ठिकाणी रुजू होईपर्यंतचा कालावधी हा सेवाखंड धरण्यात येईल व सदर सेवाखंडाची नोंद ज्येष्ठता सूचीत घेण्यात येईल.

७) बदलीने देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू न झाल्यामुळे ज्या अधिकाऱ्यांच्या सेवेमध्ये खंड पडला असेल व सदर सेवाखंड नियमित करण्याची आवश्यकता आहे असे आयुक्त शिक्षण यांची खात्री झाल्यास त्या अधिकाऱ्यांचे सेवाखंड नियमित करण्याचे प्रस्ताव शासनाकडे सादर करण्यात यावेत व नियमानुसार तपासणी करून सेवाखंड नियमित करता येईल किंवा कसे याबाबत प्रकरणपरत्वे शासनाकडून निर्णय घेण्यात येईल.

८) सदर अधिकारी/ कर्मचाऱ्याचा विलंब क्षमापित झाल्याखेरीज त्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांचा पदोन्नतीसाठी/ आश्वासित प्रगती योजनेसाठी विचार करण्यात येऊ नये. याबाबत संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांनी आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देताना योग्य ती दक्षता घ्यावी.

९) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाकडून गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांचे बदली आदेश निर्गमित झाल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत बदली झालेल्या अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधीचा कालावधी संपल्यानंतर त्याच्या पूर्वीच्या पदस्थापनेच्या आस्थापनेकडून वेतन अदा करण्यात येऊ नये. जर

संबंधित विभागाने वेतन अदा केल्यास त्याची जबाबदारी आहरण व वितरण अधिकाऱ्यावर निश्चित करून त्यांच्याविरूद्ध नियमानुसार कारवाई सुरू करावी.

१०) काही अधिकारी/ कर्मचारी बदलीने अथवा पदोन्नतीने देण्यात येणाऱ्या पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाले नाहीत या कारणास्तव त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होत नसल्याचे निदर्शनास आले आहे. याबाबत स्पष्ट करण्यात येते की, बदली अथवा पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश शासनाच्या अधिकृत (www.maharashtra.gov.in) संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येत असल्यामुळे सदर आदेश निर्गमित झाल्यानंतर ते संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना प्राप्त झाल्याचे समजण्यात येईल.

११) पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश निर्गमित झाल्यानंतर ३० दिवसाच्या आत संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक राहील. सदर कालावधीत पदस्थापनेच्या ठिकाणी संबंधित कर्मचारी / अधिकारी हजर न झाल्यास त्यांनी पदोन्नती नाकारली आहे, असे गृहीत धरण्यात येईल व सामान्य प्रशासन विभागाच्या धोरणानुसार असे अधिकारी / कर्मचारी पुढील २ वर्षे निवडसूचीस पात्र राहणार नाहीत व तिस-या वर्षी निवडसूची तयार करताना असे अधिकारी / कर्मचाऱ्यांचा विचार करण्यात येईल.

१२) जे अधिकारी / कर्मचारी तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती नाकारतात, अशा अधिकारी / कर्मचाऱ्यांचा देखिल पुढील दोन निवडसूची वर्षासाठी विचार करण्यात येणार नाही. मात्र तिसऱ्या निवडसूची वर्षामध्ये त्यांचा पदोन्नतीसाठी पुन्हा विचार करण्यात येईल.

१३) बदली अधिनियमानुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने पारित केलेल्या आदेशाचे पालन न करणे ही गंभीर स्वरूपाची बाब असून, यामुळे पालन न करणारा अधिकारी/ कर्मचारी, विभागीय चौकशी नियम पुस्तिका १९९१ च्या प्रकरण दोन मधील कलम २.१(२)(पाच) अन्वये निलंबनाच्या कार्यवाहीस पात्र ठरेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२११७३५०२३०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.03.21 17:38:03 +05'30'

**( नंद कुमार )**
शासनाचे प्रधान सचिव

**प्रति,**

१. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
३. सर्व आयुक्त, महानगरपालिका
४. सर्व शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
६. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक/ निरंतर शिक्षण)
७. सहसंचालक, आयुक्त शिक्षण कार्यालय यांनी हा शासन निर्णय सर्व संबंधितांच्या निदर्शनास

आणून देण्याची कार्यवाही करावी.

**प्रत माहितीसाठी,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक,
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहायक,
७. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक
८. कक्ष अधिकारी (प्रशा-३), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
९. निवडनस्ती (प्रशा-२).